# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक दुरूस्ती-०८१८/प्र.क्र.२९३/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०५ ऑक्टोबर २०१८.

**विषय** :- पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, येथे (१) अंतर्गत रस्त्यांची दुरूस्ती करणे, (२) तारेच्या कुंपणासह संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे, (३) कवाइत मैदान तयार करणे, व (४) गटार बांधणे व मलनि:सारण *"Pipe line"* बसविणे, या कामांसाठी प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/ २८-बी-२/ पोप्रकें.-नागपूर/दुरुस्ती/ ३७१/ २००९, दिनांक २३.०७.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाने पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, येथे (१) अंतर्गत रस्त्यांची दुरूस्ती करणे, (२) तारेच्या कुंपणासह संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे, (३) कवाइत मैदान तयार करणे, व (४) गटार बांधणे व मलनि:सारण *"Pipe line"* बसविणे, या कामांसाठी रु.२,८३,६८,११५/- इतक्या खर्चाच्या अंदाजास प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त खर्चाचे अंदाज हे उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग क्र.३, नागपूर, यांनी तयार केले असून ते कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर, व प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, यांनी साक्षांकित केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज हे सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी तपासले आहेत व ते खालील तक्यात निर्दिष्ट केल्याप्रमाणे **रु.२,९५,९०,८६३/-** असे सुधारित केले आहेत आणि, विवक्षित अटींवर, प्रशासकीय मान्यता देण्यास सहमती दिली आहे:-

| अ.क्र. *(१)* | कामाचे नाव *(२)* | खर्चाचे अंदाज *(३)* |
|---|---|---|
| १. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, येथील अंतर्गत रस्त्यांची दुरूस्ती करणे. | रु.७९,९९,२६४/- |
| २. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, याच्या सभोवती १.२० मी. उंच तारेच्या कुंपणासह उरलेल्या संरक्षण भिंतीचे बांधकाम करणे. | रु.६३,७७,०४७/- |

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| ३. | पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, येथे कवाइत मैदान तयार करणे. | रु.७३,९३,८७२/- |
| ४. | पोलीस प्रशिक्षण केद्र, नागपूर, येथे गटार बांधणे व मलनि:सारण *"Pipe line"* बसविणे. | रु. ७८,२०,६८०/- |
| **एकूण-** | | **रु.२,९५,९०,८६३/-** |

**४.** त्या अनुसार, पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर, येथे परिच्छेद **३** मधील तक्त्यातील स्तंभ *(२)* मध्ये निर्दिष्ट केलेली कामे करण्यासाठी, स्तंभ *(३)* मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे एकूण **रु.२,९५,९०,८६३/-** *(रुपये दोन कोटी, पंचाण्णव लक्ष, नव्वद हजार, आठशे त्रेसष्ट फक्त)* इतक्या खर्चाच्या अंदाजास, निधी उपलब्ध झाल्याशिवाय काम सुरू करू नये या अटीवर, याद्वारे, प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

**५.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग--मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००)(०१) जिल्हा पोलीस बल (अनिवार्य) (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४१६/ २०१८/ इमा-२, दिनांक ०५.०९.२०१८, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८१००८१५२९५९२९२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2018.10.08 15:32:32 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) अपर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण केंद्र, नागपूर.

**प्रत :-**

१) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, नागपूर *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "General Abstract" च्या प्रतीसह).*

२) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.१, नागपूर *(सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, यांनी सुधारलेल्या "General Abstract" च्या प्रतीसह).*

३) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.

५) कार्यासन अधिकारी (इमा-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

७) निवड फाईल (पोल-७).